**वन विकास करापासून मिळणा-या जमा रकमापासून वित्त व्यवस्था करण्यातआलेल्या योजना . .. सन २०१४-१५ करिता अनुदान उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- चाबाप्र-२०१४/प्र.क्र.१७६/फ-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १२ फेब्रुवारी, २०१५

**पहा:** १)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) यांचे पत्र क्र. कक्ष-२(१)/ असं/प्र.क्र.६/३२०/२०१४-१५ नागपूर दिनांक ९/१२/२०१४ व दि.२३/१२/२०१४
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२/०१/२०१५
३) शासन निर्णय क्रमांक :संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७६/फ-५, दिनांक १७ जानेवारी, २०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०९/०२/२०१५

**प्रस्तावना:**

श्रीमती शोभाताई फडणवीस, वि.स.स. यांनी मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक १२७७/२००० मध्ये मा. उच्च न्यायालय नागपूर खंडपीठ यांना सादर केलेल्या श्वेत पत्रिकेच्या अनुषंगाने वन विभागास वन संरक्षणासाठी वन विकास करामधून प्राप्त झालेल्या निधीतून अतिरिक्त निधि उपलब्ध करुन देण्यात यावा असे स्पष्ट निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी याकरिता रु.१५८.०७ लक्ष एवढे अनुदान अर्थसंकल्पीत करण्यात आले आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर यांच्या संदर्भाधिन पत्र क्र. १ च्या अनुषंगाने सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये उक्त अर्थसंकल्पीत निधी हा मजुरी, कार्यालयीन खर्च व लहान बांधकामे इत्यादीसाठी खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

रिट याचिका क्रमांक १२७७/२००० मध्ये मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने दिलेल्या आदेशानुसार वनसंरक्षणासाठी लेखाशिर्ष ४४०६-वनीकरण व वन्य जीवन, १०२ (०८((०१) वन विकास करापासून मिळणा-या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) (योजनेत्तर) या शिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी रु.१५८.०७ लक्ष अनुदान अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

सदरहू योजनेसाठी शासन निर्णय संदर्भ क्र. ३ दि.१७/०१/२०१५ अन्वये अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार ८०% रक्कम **रुपये १४३.६९ लक्ष** इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ दिनांक ९/२/२०१५ नुसार योजनेत्तर अर्थसंकल्पीत निधी ८५ % वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन सदरहू योजनेसाठी **८५% उर्वरीत निधी पैकी रु. ३.६० लक्ष** इतका निधी खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे

| खर्चाची बाब (उद्दिष्टे) | खर्चाचा विषय | खर्चाची रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|
| १३ | कार्यालयीन खर्च | ३.१४ |
| २७ | लहाण बांधकामे | ०.४६ |
| | **एकूण** | **३.६०** |

सदरहू निधी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये खर्च करण्यात यावा. निधी वितरीत करतांना तसेच खर्च करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. सदर खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात प्रधान शिर्ष "४४०६- वनीकरण व वन्य जीवन, १०२ (०८) (०१) वन विकास करापासून मिळणा-या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) (योजनेत्तर) या लेखा शिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०९/०२/२०१५ च्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१६४६३४५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.13 16:55:53 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वनविकास महामंडळ, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. महालेखापाल १ व २ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. वित्त विभाग (अर्थ-६)/ (व्यय-१०) मंत्रालय, मुंबई ३२.
६. अवर सचिव (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई-३२
७. निवड नस्ती, फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.